**मा. उच्च न्यायालयात श्री. सुदर्शनराव शेषगिरी येरगुंटाराव, सेवानिवृत्त सहायक पोलीस आयुक्त यांनी दाखल केलेल्या सिव्हील सुट क्र.३४६९/२००८ च्या संदर्भात उलट तपासणी साक्ष नोंदविण्यासाठी कोर्ट कमिशनर श्री. चंद्रकांत चव्हाण व लघुलेखक श्री. बाळकृष्ण गोविंद करूप यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप०६१५/दाक्र.३४६९/प्र.क्र.२३६/पोल-२**

गृह विभाग, २ रा मजला, मुख्य इमारात,
मादाम कामा मार्ग, मादाम कामा रोड,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च २०१७

**संदर्भ सहायक सरकारी वकिल यांचे पत्र क्र. UPD/१४३८३, दिनांक ०७.१०.२०१५**

**शासन निर्णय:**

मा. उच्च न्यायालयात श्री. सुदर्शनराव शेषगिरी येरगुंटाराव, सेवानिवृत्त सहायक पोलीस आयुक्त यांनी दाखल केलेल्या सिव्हील सुट क्र.३४६९/२००८ मध्ये मा. न्यायालयाने दिनांक ०७.१०.२०१५ च्या आदेशान्वये सदर प्रकरणी उलट तपासणी व साक्ष नोंदविण्यासाठी कोर्ट कमिशनर व लघुटंकलेखक यांची नेमणूक करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार श्री. चंद्रकांत चव्हाण यांची कोर्ट कमिशनर तर श्री बाळकृष्ण गोविंद करूप यांची लघु टंकलेखक म्हणून नियुक्ती केली आहे. कोर्ट कमिशनर यांना प्रति तास रु. ५०००/- तर लघु टंकलेखक यांना प्रति तास रू. ७५०/- या प्रमाणे फी ठरविण्यात आलेली आहे. सदर फी ही दोन्ही पक्षकारांनी समान विभागून (५० टक्के प्रति) प्रमाणात देणे आवश्यक आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी श्री. चंद्रकांत चव्हाण व श्री बाळकृष्ण गोविंद यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रतितास परिणामकारक सुनावणी फी(कोर्ट कमिशनर) रु.५,०००/-
(दोन्ही पक्षकारांनी विभागून)
२) प्रतितास परिणामकारक सुनावणी फी(लघुटाकलेखक) रु.७५०/-
(दोन्ही पक्षकारांनी विभागून)

२. परिणामकारक सुनावणीचे तास संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. तसेच, प्रस्तुत प्रकरणी श्री. चंद्रकांत चव्हाण व श्री बाळकृष्ण गोविंद करुप यांना अपरिणामकारक सुनावणी फी वा इतर कोणताही भत्ता,फी अनुज्ञेय असणार नाही

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०१, गुन्हा अन्वेषण व दक्षता (००) (०१) गुन्हा अन्वेषण विभाग, बृहन्मुंबई - (२०५५ ००३२) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१२०७४६४१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Deepak Uttamrao Pokale
Date: 2017.03.27 12:10:10 +05'30'

**(दिपक पोकळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सह पोलीस आयुक्त, समाज सेवा शाखा, गुन्हे शाखा, गु.अ.विभाग, पोलीस आयुक्त कार्यालय, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. निवड नस्ती (पोल-२).